अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१०-२०११

३६०४ - स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे. २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे (दोन) गौण खनिजावरील स्वामित्वधनाच्या मिळकतीतून अभिहस्तांकित रकमा देण्यासाठी ग्राम पंचायतीना सहाय्य.

(३६०४०३१६) (मागणी क्र. एल -५)

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. बीजीटी २६१०-प्र.क्र.८३/पंरा-४
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक - १२ ऑक्टोबर, २०१०.

संदर्भ:- शासन निर्णय, समक्रमांक, दि.३०.४.२०१०

शासन निर्णय :-

गौण खनिजांवरील स्वामित्व धनाच्या मिळकतीतून अभिहस्तांकित रक्कम देण्यासाठी ग्राम पंचायतींना सहाय्य देण्यासाठी सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी उपरोक्त लेखाशिर्षातर्गत रक्कम रु. १२,१९,५०,०००/- (रुपये बारा कोटी एकोणवीस लक्ष पन्नास हजार फक्त )एवढी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

२. उपरोक्त अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी एप्रिल, २०१० व मे, २०१० या दोन महिन्यांच्या लेखानुदानाची रक्कम रुपये २,२३,५८,०००/- (रुपये दोन कोटी तेवीस लक्ष अठ्ठावन्न हजार फक्त) जिल्हाधिकारी यांच्याकडे संदर्भीय शासन निर्णयान्वये सुपूर्द करण्यांत आली आहे. उर्वरित मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी या शासन निर्णयान्वये रु. ४,९७, ००,०००/- (रु. चार कोटी सत्त्याण्णव लक्ष फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी यांचेकडे सुपूर्द करण्यांत येत आहे.

३. जिल्हाधिकारी यांना निर्देश करण्यात येते की, या वर्षीची तरतूद ही गौण खनिजावरील स्वामित्व धनाच्या मिळकतीतून प्रत्यक्ष कोषागारात जमा झालेल्या सन २००८-२००९ या वित्तीय वर्षातील वसूलीच्या आधारे संबंधित ग्राम पंचायतींना तहसिलदार यांचेमार्फत अनुदानाचे वाटप करण्यात यावे . आणि वाटप केलेल्या त्यांच्या आदेशाच्या प्रती शासनाकडे पाठवाव्यात. परंतु

या योजनेपोटी ग्रामपंचायतींना देय असलेली अनुदानाची रक्कम अधिकतम रु. १ लाखापेक्षा अधिक असणार नाही. जिल्हाधिकारी यांनी शासन निर्णयात मंजूर केलेल्या तरतूदीपेक्षा रक्कम जादा खर्च होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

४. गौण खनिजावरील स्वामित्व धनाच्या मिळकतीतून २००९-२०१० या वर्षामध्ये प्रत्यक्षात किती रक्कम जिल्हाधिका-यांकडून राज्य शासनाच्या खाती जमा झालेली आहे व किती रक्कम ग्रामपंचायतींना देय आहे. याबाबतची स्पष्ट माहिती जिल्हाधिका-यांनी तत्परतेने शासनास कळवावी.

५. गाववार याद्यानुसार देय होणा-या अनुदानाचे आदेश गाववार याद्यांसह संबंधित तहसिलदार यांनी काढावेत व गाववार याद्यासह रक्कम कोषागारातून काढून गट विकास अधिका-यांकडे पाठवावी आणि गट विकास अधिकारी यांनी गाववार याद्यानुसार सदर अनुदानाची रक्कम धनादेशाव्दारे संबंधित ग्रामपंचायतींना द्यावी.

६. खर्चाचा मेळ घालण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्तांना पाठवावीत व विभागीय आयुक्तांनी मंजूर रक्कमेच्या कोषागारातून अदा केल्या गेलेल्या मासिक खर्चाचा महालेखापाल , महाराष्ट्र १ व २ अनुक्रमे मुंबई व नागपूर यांच्या कार्यालयाशी ताळमेळ घालावा व त्याप्रमाणे शासनास कळवावे.

७. मंजूर करण्यात आलेल्या अनुदानांवरील खर्च " ३६०४- स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे २०० इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे (०१) (०२)गौण खनिजावरील स्वामित्व धनाच्या मिळकतीतून अभिहस्तांकित रक्कमा देण्यासाठी ग्राम पंचायतींना सहाय्य ( ३६०४०३१६) (दत्तमत योजनेतर ) ( मागणी क्र. एल ५)" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात केलेल्या मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानाच्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. हे अनुदान शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्देशित केलेल्या विहित अटी व शर्तीच्या अधीन राहील. तसेच वितरित निधीच्या खर्चाचा तपशील शासनास तात्काळ सादर करावा. तसेच सदर वितरीत केलेला निधी अखर्चीत राहिल्यास उर्वरित निधी मंजूर केला जाणार नाही. त्याची संपूर्ण जबाबदारी आपल्या कार्यालयाची राहिल.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक -२२४/१० व्यय-१५ दि. १३/९/२०१० व अनौपचारिक संदर्भ क्रमांक -६६५/१० अर्थ -१७ दि. ३०/०९/२०१० अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक 201001317595001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(प्र.वि.पाटील)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) जिल्हाधिकारी (सर्व)
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
५) महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई (लेखापरिक्षा) ( ५ जादा प्रतीसह )
६) महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता )( ५ जादा प्रतीसह )
७) महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर (लेखा परिक्षा) ( ५ जादा प्रतीसह)
८) महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता ) ( ५ जादा प्रतीसह )
९) उप मुख्यलेखापरिक्षा,स्थानिकनिधीलेखा,कोकण(वाशी /पुणे/ नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपूर )
१०) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
११) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई
१२) निवासी लेखा अधिकारी, लेखा व अधिदान कार्यालय, मुंबई
१३) वित्त विभाग, (व्यय -१५) (अर्थसंकल्प -१६)
१४) कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग (का.क्र. वित्त-१, वित्त-७, वित्त-८)
१५) निवड नस्ती का.क्र. पंरा-४ ग्राम विकास व जलसंधारण विभाग

# विवरणपत्र

३६०४ गौण खनिजावरील स्वामित्वधनाच्या मिळकतीतून अभिहस्तांकित रकमा देण्यासाठी ग्रामपंचायतीना सहाय्य ( ३६०४०३१६) (मागणी क्र. एल -५) शासन निर्णय , ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक बीजीटी २६१०/प्र.क्र.८३ /पंरा-४ दिनांक १२ ऑक्टोबर, २०१० चे विवरणपत्र

( रु. लाखात )

| अ.क्र. | जिल्हा | या शासन निर्णयान्वये मंजूर अनुदान (रुपये अंकी) (रुपये लाखात) | ( रुपये अक्षरी ) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ९.३१ | (रुपये नऊ लक्ष एकतीस हजार फक्त ) |
| २ | रायगड | १९.३२ | (रुपये एकोणीस लक्ष बत्तीस हजार फक्त ) |
| ३ | रत्नागिरी | १७.७४ | (रुपये सतरा लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त ) |
| ४ | सिंधूदुर्ग | १४.४७ | (रुपये चौदा लक्ष सत्तेचाळीस हजार फक्त ) |
| ५ | नाशिक | २४.२३ | (रुपये चोवीस लक्ष तेवीस हजार फक्त ) |
| ६ | धुळे | ३.६५ | (रुपये तीन लक्ष पासष्ट हजार फक्त ) |
| ७ | नंदूरबार | १२.३६ | (रुपये बारा लक्ष छत्तीस हजार फक्त ) |
| ८ | जळगांव | ३५.०६ | (रुपये पस्तीस लक्ष सहा हजार फक्त ) |
| ९ | अहमदनगर | १.२२ | (रुपये एक लक्ष बाबीस हजार फक्त ) |
| १० | पुणे | २०.८३ | (रुपये वीस लक्ष त्र्याऐंशी हजार फक्त ) |
| ११ | सातारा | १.७८ | (रुपये एक लक्ष अठ्ठयाहत्तर हजार फक्त ) |
| १२ | सांगली | ७.०७ | (रुपये सात लक्ष सात हजार फक्त ) |
| १३ | सोलापूर | १४.६७ | (रुपये चौदा लक्ष सदुसष्ट हजार फक्त ) |
| १४ | कोल्हापूर | ५.६२ | (रुपये पाच लक्ष बासष्ट हजार फक्त ) |
| १५ | औरंगाबाद | १३.२० | (रुपये तेरा लक्ष वीस हजार फक्त ) |
| १६ | जालना | ११.०७ | (रुपये अकरा लक्ष सात हजार फक्त ) |
| १७ | परभणी | १०.०३ | (रुपये दहा लक्ष तीन हजार फक्त ) |
| १८ | हिंगोली | १२.०० | (रुपये बारा लक्ष फक्त ) |
| १९ | बीड | २.५१ | (रुपये दोन लक्ष एकावन्न हजार फक्त ) |
| २० | नांदेड | १४.०३ | (रुपये चौदा लक्ष तीन हजार फक्त ) |
| २१ | उस्मानाबाद | १७.२१ | (रुपये सतरा लक्ष एकवीस हजार फक्त ) |
| २२ | लातूर | ११.६० | (रुपये अकरा लक्ष साठ हजार फक्त ) |
| २३ | बुलढाणा | २६.१९ | (रुपये सव्वीस लक्ष एकोणीस हजार फक्त ) |

| | | | |
|---|---|---|---|
| २४ | अकोला | १२.३६ | (रुपये बारा लक्ष छत्तीस हजार फक्त ) |
| २५ | वाशिम | २०.६१ | (रुपये वीस लक्ष एकसष्ट हजार फक्त ) |
| २६ | अमरावती | ३५.७९ | (रुपये पस्तीस लक्ष एकोणऐंशी हजार फक्त ) |
| २७ | यवतमाळ | १५.६३ | (रुपये पंधरा लक्ष त्रेसष्ट हजार फक्त ) |
| २८ | वर्धा | ४७.०० | (रुपये सत्तेचाळीस लक्ष फक्त ) |
| २९ | नागपूर | १३.८५ | (रुपये तेरा लक्ष पंच्याऐंशी हजार फक्त ) |
| ३० | भंडारा | १०.२७ | (रुपये दहा लक्ष सत्तावीस हजार फक्त ) |
| ३१ | गोंदिया | ६.१६ | (रुपये सहा लक्ष सोळा हजार फक्त ) |
| ३२ | चंद्रपूर | २१.०५ | (रुपये एकवीस लक्ष पाच हजार फक्त ) |
| ३३ | गडचिरोली | ९.११ | (रुपये नऊ लक्ष अकरा हजार फक्त ) |
| | **सर्व एकूण** | ४९७.०० | (रुपये चार कोटी सत्त्याण्णव लक्ष फक्त) |

**(प्र.वि.पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**